भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील पदवीधारक, पदविकाधारक व अर्हतारहित कनिष्ठ अभियंता यांना शाखा अभियंता दर्जा देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः आपना-०२१८/प्र.क्र.७७/पापु-१५**

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१
तारीख: ०८ जून, २०१८

वाचा :-

१) **शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्रमांकः** सीडीएस-१५८१/१५८/(२१५)/आ-१, दिनांक १६/०४/१९८४

२) **शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्रमांकः** बीसीएस-२४८४/(१०७)/आ-२, दिनांक २८/०९/१९९४

३) **शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांकः** आपना-१६८६/ प्र.क्र.१८९६/ जल-५, दिनांक २२/०७/१९९४

४) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** आपना-१०१०/प्र.क्र.२७५/पापु-१५ दिनांक ३०/०९/२०११

५) **शासन पत्र, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांकः** झेडएनजी-१००४/ प्र.क्र.१२२९/ आस्था-४, दिनांक ०६/१२/२००४

६) **श्री.डी.एम.बिराजदार, शाखा अभियंता यांचे निवेदन दिनांक** २०/०२/२०१८

७) **संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे पत्र क्रमांकः** प्रशासन/आस्था-५/शाखा अभियंता/गट-ब/सेवाज्येष्ठता/१२१६/२०१८, दिनांक २१/०३/२०१८

**<u>प्रस्तावना :-</u>**

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील पदवीधारक, पदविकाधारक व अर्हतारहित शाखा अभियंता यांना संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयातील तरतूदीनुसार शाखा अभियंता हा राजपत्रित दर्जा देण्यात येतो.

ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या संदर्भाधीन क्र. ५ येथील पत्रातील निर्देशानुसार पदवीधर कनिष्ठ अभियंत्यांना मागील ३ वर्षाचे गोपनीय अहवाल विचारात घेऊन शासन निर्णय, ग्राम विकास विभाग, क्रमांक झेडजीओ-१०८६/सीआर २९८६/११, दिनांक ११ मार्च, १९८७ मध्ये नमूद केल्यानुसार शाखा अभियंता या पदाचा दर्जा हा सेवेत लागल्यापासून ३ वर्षानंतर येणाऱ्या "१ एप्रिल" पासून देण्याची तरतूद आहे.

या विभागाच्या संदर्भाधीन क्र.४ येथील शासन निर्णयान्वये श्री. ए.बी.जायभाये, कनिष्ठ अभियंता यांना दिनांक १/११/२००७ पासून शाखा अभियंता या पदाचा दर्जा देण्यात आला असून विभागाने दिनांक २२ फेब्रुवारी, २०१६ रोजी प्रसिध्द केलेल्या शाखा अभियंता (गट-ब) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या ज्येष्ठतासूची मध्ये श्री. बिराजदार यांना श्री. जायभाये यांच्या नंतर ज्येष्ठता दर्शविली असल्याने श्री.बिराजदार यांनी संदर्भाधीन क्र. ६ येथील अर्जान्वये श्री. जायभाये यांना देण्यात आलेल्या शाखा अभियंता पदाच्या दर्जाचा दिनांक सुधारीत करण्याची व त्यांना श्री. जायभाये यांच्या अगोदर ज्येष्ठता दर्शविण्याची विनंती केलेली आहे.

संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी संदर्भाधीन क्र. ७ येथील पत्रान्वये श्री.जायभाये यांना शाखा अभियंता पदाचा दर्जा दिल्याच्या दिनांकामध्ये सुधारणा करण्याची शिफारस करून श्री. बिराजदार यांना श्री. जायभाये यांच्या अगोदर ज्येष्ठता दर्शविण्याची विनंती केली आहे.

ग्राम विकास विभागाचे संदर्भाधीन शासन निर्णय, संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी शासनास केलेली शिफारस यानुसार श्री. ए.बी.जायभाये यांना संदर्भाधीन क्र.४ येथील शासन निर्णयान्वये शाखा अभियंता या पदाचा दर्जा दिल्याची तारीख दिनांक ०१/११/२००७ यामध्ये सुधारणा करण्याची बाब विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

श्री. ए.बी.जायभाये यांना संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये शाखा अभियंता या पदाचा दर्जा दिल्याच्या दिनांक ०१/११/२००७ या दिनांकामध्ये सुधारणा करण्यात येत असून श्री.ए.बी.जायभाये यांना शाखा अभियंता या पदाचा राजपत्रित दर्जा देऊन नेमणूक करण्यात येत असल्याचा त्यांचा दिनांक हा दिनांक ०१/०४/२००८ असा निश्चित करण्यात येत आहे.

श्री.जायभाये यांना शाखा अभियंता या पदाचा राजपत्रित दर्जा देऊन नेमणूक करण्यात येत असलेल्या दिनांकामध्ये सुधारणा केली असल्यामुळे त्यांच्या वेतनामध्ये बदल होत असल्यास त्याची परिगणना करून ते निश्चित करण्याची कार्यवाही संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी तात्काळ करावी. सदर वेतननिश्चिती वेतन पडताळणी पथकाच्या पडताळणीच्या अधीन राहून करण्यात यावी. वेतन पडताळणी नंतर श्री. जायभाये यांना अतिप्रदान केल्याचे निदर्शनास येत असल्यास त्यांच्याकडून अतिप्रदान केलेल्या रकमेची वसुली करण्यात यावी.

श्री. जायभाये यांना शाखा अभियंता या पदाचा राजपत्रित दर्जा देऊन नेमणूक करण्यात येत असलेल्या दिनांकामध्ये सुधारणा केली असल्यामुळे त्यांच्या ज्येष्ठतेमध्ये बदल संभवत असल्यास बदलासह सुधारीत प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करण्याचे संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना सूचित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201806081527326428 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2018.06.08 16:45:03 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
३. मा. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजी नगर, पुणे.
५. प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)
६. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)
७. शाखा अभियंता, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)
८. निवडनस्ती (पापु-१५)